**मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०१८-१९ करिता पहिला हप्ता अनुदान रुपये ४४.०४ लाख रक्कम वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन निर्णय क्रमांक: मुअप्र-२०१८/प्र.क्र.२३/९-अे

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक:-०१ फेब्रुवारी, २०१९**

**संदर्भ-** (१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राअअ-१११६/प्र.क्र.२४८/१४-अे, दिनांक २० जून, २०१७

(२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृप्रधो-२०१७/प्र.क्र.२०८/९-अे, दि.३१ ऑक्टोबर, २०१७

(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र: अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२एप्रिल,२०१८

(४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. कृराधो-१४१७/प्र.क्र.१०९/९-अे, दि.६ जून, २०१८

(५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राअअ-२०१८/प्र.क्र.१७९/९-अे, दि.२० जून, २०१८

(६) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र. कृआ/कृप्र/मुकृवअप्र/अनु मागणी/२८९/२०१८, दिनांक १२ ऑक्टोबर, २०१८

(७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५ जानेवारी २०१९

**प्रस्तावना :-**

राज्यातील अन्न प्रक्रिया उद्योगाला चालना देणे, शेतीमालाचे मूल्यवर्धन करण्याकरिता शेतकऱ्यांच्या सहभागाद्वारे आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित प्रकल्प स्थापित करण्यास प्रोत्पाहन देणे, उत्पादित अन्न पदार्थाच्या गुणवत्तेमध्ये वाढ व्हावी, उर्जेची बचत व्हावी यासाठीच्या प्रकल्पाच्या आधुनिकीकरणास प्रोत्साहन देणे या उद्दिष्टांसह राज्यामध्ये सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना ही नवीन १०० % राज्य पुरस्कृत योजना पुढील पाच वर्षाकरिता राबविण्यास दिनांक २० जून, २०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये राज्याचे कृषि व अन्न प्रक्रिया धोरण २०१७ जाहीर करण्यात आले आहे.

त्याअनुषंगाने, मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता रु. ५००० लक्ष (रु.पन्नास कोटी फक्त) ची तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली असून सदर योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्याकरिता संदर्भाधीन क्र.५ येथील दिनांक २० जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत पहिल्या हप्त्याचा रुपये ४४.०४ लाख एवढा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी या शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पहिला हप्ता रुपये ४४.०४लाख (रुपये चव्वेचाळीस लाख चार हजार फक्त) पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**(रक्कम रुपये लाख)**

| अ.क्र. | योजनेचे नांव | (१०० % राज्य हिस्सा) |
|---|---|---|
| १ | मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना | ४४.०४ |

२. आयुक्तस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.२६/१०/२०१८ च्या बैठकीत मंजूर प्रकल्पांची यादी **परिशिष्ट “अ”** येथे जोडण्यात आली आहे.

३. या शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी खालील लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

**"मागणी क्र. डी-३,**
**२४०१ पीक संवर्धन,**
**(००) (१०२) अन्नधान्य पीके,**
**(००) (३४) मुख्यमंत्री कृषि व अन्न प्रक्रिया योजना (१०० % राज्य योजना)**
**(२४०१ A ७९१)**
**३३,अर्थसहाय्य".**

४. या योजनेंतर्गत वितरित करण्यात आलेल्या रुपये ४४.०४ लाख रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली रुपये ४४.०४ लाख रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी वर्ग करावा.

६. सदर योजनेअंतर्गत अनुदान/खर्चाच्या रकमा DBT (Direct Beneficiary Transfer) द्वारे प्रदान करण्यात याव्यात.

७. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

९. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी, २०१९ मधील अटी व शर्तीचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०२११५९०९४४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.02.02 12:00:58 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.

२) मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. सचिव (कृषि) यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
७) संचालक (कृषि प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर
१२) निवड नस्ती (का.९ अे)

## परिशिष्ठ "अ"
## शासन निर्णय क्रमांक:-मुअप्र-२०१८/प्र.क्र.२३/९अे, दि.०१/०२/२०१९

### आयुक्तस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.२६/१०/२०१८ च्या बैठकीत मंजूर प्रकल्पांची यादी

( रू.लाख )

| अ क्र | प्रकल्पाचे नाव व ठिकाण | प्रोडक्ट | प्रमोटर | प्रकल्प किंमत | एकूण मंजूर अनुदान | प्रथम हप्ता अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मे.जे.बी.आर.फुडस् प्रॉडक्टस, मु.पो.जंगलेवाडी, ता.श्रीगोंदा जि.अहमदनगर | गुळ उत्पादन | श्री.जिजाबा बाबाजी रोडे | ११८.१५ | २५.६० | १२.८० |
| २ | मे.श्री.लक्ष्मी इंडस्ट्रीज, गट नं.२५२, लांगी रोड मु.साखरी टोला, पो.कावरबंद, ता. सालेकसा, जि.गोंदिया | राईस मिल | श्री.दिपक मनोहरलाल अग्रवाल | ४७५.०० | ५०.०० | २५.०० |
| ३ | मे.निर्मिती महिला औद्योगिक सहकारी संस्था प्लॉट नं.१२६, संगमनेर एमआयडीसी, ता.संगमनेर, जि.अहमदनगर | बेकरी प्रॉडक्टस | महिला औद्योगिक सहकारी संस्था | २५.०० | ६.१९ | ३.०९ |
| ४ | मे.शिवपर्व फुडस, गट नं५१७, मु.पो. घोगाव, ता.पलुस, जि.सांगली | फळे व भाजीपाला | श्री.पृथ्वीराज धनाजी चव्हाण | ५४.३६ | ६.३० | ३.१५ |
| | एकूण | | | ६७२.५१ | ८८.०९ | ४४.०४ |